**महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा**
**गट -अ मधील (पे बॅंड रु.१५६००-३९१००**
**ग्रेड पे रु.६६००/-) या जिल्हा**
**शल्यचिकित्सक संवर्गात देण्यात आलेली**
**नियुक्ती रदद करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्र. पदोन्न-१२११/प्र.क्र.१८/सेवा-२**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक :- १३ जून,२०११.**

**वाचा :- १) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र. पदोन्न-१२११/प्र.क्र. १८/सेवा-२ दि. ०३.३.२०११**
**२) शासन निर्णय क्र. विभाचौ १००९/प्र.क्र.७२/सेवा-४अ, दिनांक २१ नोव्हेंबर, २००९**

**प्रस्तावना :-**

डॉ.अशोक नारायण हुबेकर, वैदयकीय अधिकारी, स्त्री रुग्णालय, नेकनूर, जि. बीड यांच्या नावाची शिफारस जिल्हा शल्य चिकित्सक संवर्गातील पदासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून करण्यात आली आहे. त्याअनुषंगाने डॉ. हुबेकर यांना शासन निर्णय दि. ०३.०३.२०११ अन्वये वैदयकीय अधिक्षक, ग्रामीण रुग्णालय, केज, जिल्हा बीड या पदी नियुक्ती देण्यात आली आहे. तथापि, डॉ. हुबेकर यांना शासन निर्णय दि.२१.११.२००९ च्या आदेशान्वये शासन सेवेतून निलंबित करण्यात आल्याचे निदर्शनास आले आहे. यास्तव संदर्भ क्र.१ येथील दि. ३.३.२०११ च्या शासन निर्णयाअन्वये त्यांना देण्यात आलेली जिल्हा शल्य चिकित्सक संवर्गातील नियुक्ती रदद करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट -अ (वेतनश्रेणी रु.१५६००-३९१०० + ग्रेड पे ५४००) या वेतनश्रेणीमधील डॉ.अशोक नारायण हुबेकर, वैदयकीय अधिकारी, स्त्री रुग्णालय, नेकनूर, जि. बीड यांना महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट -अ (वेतनश्रेणी रु.१५६००-३९१०० + ग्रेड पे ६६००) मध्ये जिल्हा शल्य चिकित्सक संवर्गात संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णयान्वये नामनिर्देशनाच्या वाटयावरील पदावर नियुक्ती देण्यात

आली होती व त्यांची पदस्थापना वैदयकीय अधिक्षक, ग्रामीण रुग्णालय, केज, जि. बीड येथे करण्यात आली होती. तथापि, त्यांना संदर्भ क्र.२ वरील शासन आदेश दि. २१.११.२००९ अन्वये निलंबीत करण्यात आले असल्याचे निदर्शनास आल्याने आहे. यास्तव शासन या आदेशान्वये डॉ.अशोक नारायण हुबेकर, वैदयकीय अधिकारी, स्त्री रुग्णालय, नेकनूर, जि. बीड यांचे दि.३.३.२०११ रोजीचे नियुक्तीचे आदेश तात्काळ रदद करीत आहे.

सदरचे आदेश तात्काळ अंमलात येतील. सदर आदेश www.maharashtra.gov.in वर साकेतांक क्र. २०११०५३०११२५२०००१ येथे प्रसारीत करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(राजेंद्र पवार)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राद्वारे)
विभागीय आयुक्त
संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
सहसंचालक (प्रशासन व अर्थसंकल्प), आरोग्य सेवा, मुंबई
उपसंचालक, आरोग्य सेवा, लातूर मंडळ, लातूर
जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय बीड
महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखापरिक्षा/ लेखा अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, बीड/लातूर
सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन १२ व १६ ब), मंत्रालय, मुंबई
संबंधित वैद्यकीय अधिकारी, (द्वारा संचालक, आरोग्य सेवा, मुंबई)
निवडनस्ती, सेवा-२